<u>पुनर्वसन आस्थापना छ.संभाजीनगर विभाग</u>
प्रकल्प विस्थापितांच्या पुनर्वसनाच्या कामासाठी निर्माण करण्यात आलेल्या छ.संभाजीनगर विभागातील मंजूर अस्थायी पदांना दिनांक ०१/०३/२०२४ ते दिनांक ३१/०८/२०२४ पर्यंत मुदतवाढ देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- ईएसटी-२०२३/प्र.क्र.४५/र-३**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक:- २३ एप्रिल,२०२४.

<u>वाचा</u>:-

१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक आरपीऐ-२००८/प्र.क्र.४३२/र-१, दि. २८/०१/२०१०.
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक आरपीए २००८/प्र.क्र.४३२/र-१, दि.२१/०४/२०१०.
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक ईएसटी- २०२३/प्र.क्र.४५/र-३, दि. १७/१०/२०२३
४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क.,दिनांक २१/२/२०२४
५). विभागीय आयुक्त, छ.संभाजीनगर_विभाग यांचे पत्र जा.क्र.२०२४/पुनर्वसन/लेखा/मुदतवाढ/२८ दि.२०/०२/२०२४.

<u>प्रस्तावना:-</u>

छ.संभाजीनगरविभागातील प्रकल्पग्रस्तांच्या पुनर्वसनाच्या कामासाठी निर्माण करण्यात आलेल्या ४३ अस्थायी पदांना शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक ईएसटी २०२३/प्र.क्र.४५/र-३, दि. १३/०४/२०२३ अन्वये दिनांक ०१/०९/२०२३ ते दि.२९/०२/२०२४ पर्यत मुदतवाढ मंजूर करण्यात आली होती.

वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.४ येथील दि. २१/०२/२०२४ च्या शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आस्थापनेवरील व त्यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील कार्यालयांच्या आस्थापनेवरील अस्तित्वात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दि.०१/०३/२०२४ ते दि.३१/०८/२०२४ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार देण्यात आलेले आहेत. त्यानुसार छ.संभाजीनगर विभागात मंजूर असलेल्या एकूण ४३ अस्थायी पदांना दि.०१/०३/२०२४ ते दि.३१/०८/२०२४ पर्यंत चालू वर्षासाठी मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

विभागीय आयुक्त, छ.संभाजीनगर विभाग, छ.संभाजीनगर तसेच छ.संभाजीनगर / बीड/ जालना/ परभणी/ नांदेड/ धाराशिव व लातूर या जिल्हा पुनर्वसन कार्यालयात प्रकल्प विस्थापितांच्या पुनर्वसनाच्या कामासाठी निर्माण करण्यात आलेल्या ४३ अस्थायी पदांना दिनांक ०१/०३/२०२४ ते दि.३१/०८/२०२४ या दिनांकापर्यंत चालू ठेवण्यास पुढील अटींच्या अधीन राहून या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

१. सर्व पदे संबंधित विभागातील संवर्गातील तात्पुरती वाढ समजण्यात यावीत. या पदधारकांना नियमाप्रमाणे महागाई भत्ता व अन्य भत्ते देय आहेत.

२. विवरणपत्रातील पदांपैकी कोणतेही पद सहा महिन्यांपेक्षा जास्त कालावधीसाठी रिक्त अथवा अतिरिक्त कार्यभाराने चालू रहाणार नाहीत.

३. या ४३ पदांवर सन २०२४-२०२५ या वित्तीय वर्षात होणा-या खर्चापैकी आयुक्त, छ.संभाजीनगर विभाग, छ.संभाजीनगर यांच्या कार्यालयातील ७ पदांचे वेतन व इतर भत्त्यावरील खर्च हा "मागणी क्रमांक

सी-५ मुख्य लेखाशीर्ष २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण (०३) प्रकल्पबाधित व्यक्तींची पुनर्वसाहत, आयुक्त छ.संभाजीनगर (०३) (०६) (२२३५ १९२४) (अनिवार्य) (दत्तमत)" या लेखाशीर्षाखाली टाकावा व त्याच लेखाशीर्षाखाली सन २०२४-२०२५ साठीच्या मंजूर झालेल्या अनुदानातून खर्च करण्यात यावा. तसेच जिल्हाधिकारी कार्यालयांमधील पुनर्वसन आस्थापनेवरील ३६ पदांचे वेतन व इतर भत्त्यांवरील खर्च "मागणी क्रमांक सी-५, मुख्य लेखाशीर्ष २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, (०४) प्रकल्पबाधित व्यक्तींचे पुनर्वसन, आयुक्त छ.संभाजीनगर (०४) (०६) (२२३५ १९८९) (अनिवार्य) (दत्तमत)" या लेखाशीर्षाखाली टाकावा व तो त्याच लेखाशीर्षाखाली सन २०२४-२०२५ साठीच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. सदरहू योजनांतर्गत खर्च अंतिमत: गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळाकडे वर्ग करण्यात यावा.

सदर शासन निर्णय, वित्त विभाग शासन निर्णय, क्रमांक-पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक २१/०२/२०२४ नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०४२३१५२९४९७३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

KEDARPRATAP
JAYSING PATIL

Digitally signed by KEDARPRATAP JAYSING PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=8a304b555c16c6333932e94031b478a58b30bb35922ff7cfdc101bf31d56ff8d, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=3847160374ED91C72AF7F541ED5885A54E39968A0CDDD47C85355D5B730A40BF, cn=KEDARPRATAP JAYSING PATIL
Date: 2024.04.23 15:41:52 +05'30'

**( केदारप्रताप पाटील )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**सोबत:-** विवरणपत्र.

**प्रति,**

१. विभागीय आयुक्त, छ.संभाजीनगर विभाग, छ.संभाजीनगर.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई/ नागपूर.
३. महालेखापाल ( लेखा परिक्षा ) महाराष्ट्र राज्य, मुंबई /नागपूर.
४. जिल्हाधिकारी, छ.संभाजीनगर / बीड/ जालना/ परभणी/ नांदेड/धाराशिव / लातूर.
५. जिल्हा कोषागार अधिकारी छ.संभाजीनगर / बीड/ जालना/ परभणी/ नांदेड/ धाराशिव/ लातूर.
६. वित्त विभाग (कार्यासन व्यय-१०/अर्थसंकल्प-१९), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
७. प्रधान सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
८. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
९. कार्यासन अधिकारी ब-१/र-१/र-८, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१०. निवड नस्ती, कार्यासन र-३, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

## विवरणपत्र

शासन निर्णय महसूल व वन विभाग क्रमांक ईएसटी-२०२३/प्र.क्र.४५/र-३, दिनांक २३ एप्रिल, २०२४ अन्वये दि. ०१/०३/२०२४ ते दि.३१/०८/२०२४ पर्यंत छ.संभाजीनगर विभागातील अस्थायी पदांना मुदतवाढ दिलेल्या पदांबाबतचे विवरणपत्र.

| अ.क्र. | पदांचा तपशील व वेतनश्रेणी | आयुक्त छत्रपती संभाजी-नगर विभाग यांचे कार्यालय | जिल्हाधिकारी कार्यालय | | | | | | | एकूण |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | छत्रपती संभाजी-नगर | बीड | जालना | परभणी | नांदेड | धाराशिव | लातूर | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ |
| १) | उपआयुक्त (पुनर्वसन) (अपर जिल्हाधिकारी श्रेणीतील) S-२५ ७८८००-२०९२०० | ०१ | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | ०१ |
| २) | जिल्हा पुनर्वसन अधिकारी (उपजिल्हाधिकारी श्रेणीतील) S-२० ५६१००-१७७५०० | -- | ०१ | -- | ०१ | ०१ | ०१ | ०१ | ०१ | ०६ |
| ३) | उपलेखापाल S-२० ५६१००-१७७५०० | ०१ | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | ०१ |
| ४) | अव्वल कारकून S-१२ ३२०००-१०१६०० | ०१ | ०१ | ०१ | ०१ | -- | ०१ | ०१ | ०१ | ०७ |
| ५) | मंडळ अधिकारी S-१२ ३२०००-१०१६०० | -- | ०१ | ०१ | ०१ | -- | ०१ | ०१ | ०१ | ०६ |
| ६) | तलाठी S-०८ २५५००-८११०० | -- | -- | -- | ०१ | -- | ०१ | -- | ०१ | ०३ |
| ७) | लघुटंकलेखक S-०६ १९९००-६३२०० | ०१ | -- | -- | -- | -- | -- | -- | -- | ०१ |
| ८) | कनिष्ठ लिपिक S-०६ १९९००-६३२०० | ०१ | ०१ | ०१ | ०१ | ०१ | ०१ | ०१ | ०१ | ०८ |
| ९) | वाहनचालक S-०७ २१७००-६९१०० | ०१ | ०१ | -- | ०१ | -- | -- | -- | -- | ०३ |
| १०) | शिपाई S-०४ १७१००-५४००० | ०१ | ०१ | -- | ०१ | ०१ | ०१ | ०१ | ०१ | ०७ |
| | **एकूण** | **०७** | **०६** | **०३** | **०७** | **०३** | **०६** | **०५** | **०६** | **४३** |

KEDARPRATAP JAYSING PATIL

Digitally signed by KEDARPRATAP JAYSING PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=8a304b555c16c6333932e94031b478a58b30bb35922ff7cfdc101bf31d56ff8d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3847160374ED91C72AF7F541ED5885A54E39968A0CDDD47C85355D5B730A40BF, cn=KEDARPRATAP JAYSING PATIL
Date: 2024.04.23 15:42:11 +05'30'

( केदारप्रताप पाटील )
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन